**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांच्या अधिनस्त पशुवैद्यक महाविद्यालय, नागपूर व स्नातकोत्तर पशुवैद्यक व पशुविज्ञान संस्था, अकोला येथे शेतकऱ्यांसाठी व्यावसायिक कुक्कुटपालन प्रशिक्षण केंद्राची स्थापना करणे या प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. राकृवि-२०१४/प्र.क्र.२३४/पदुम-४,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : ३० सप्टेंबर, २०१४.**

वाचा —

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. एफवायपी- १२(१२) / सीआर- १०५८/२०१२/पसं-०६, पुणे-७, दि.०७.०४.२०१४.
२. राकृवियो कक्ष यांचे पत्र क्र.राकृवि-०५१४/प्र.क्र.२६/ राकृवियो कक्ष, दि. १८.०७.२०१४ अन्वये दि. ०५.०७.२०१४ रोजी पार पडलेल्या १८ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.एफवायपी-१२(१२) / सीआर- १०५८/२०१२/पसं-०६, पुणे-७, दि.१८.०९.२०१४.

प्रस्तावना —

कुक्कुटपालन हा शेतीस पुरक व्यवसाय म्हणून ओळखला जातो. परसातील कुक्कुटपालनाद्वारे शेतकऱ्यांना त्यांच्या दैनंदिन जीवनात आर्थिक हातभार लावण्यास मदत होते. कुक्कुटपालन व्यवसाय शास्त्रोक्त पध्दतीने केल्यास, शेतकरी वर्गाची आर्थिक स्थिती सुधारेल व त्यातुन नवीन उद्योजक निश्चितपणे निर्माण होतील. परंतु, आजच्या घडीला विशेषत: व्यावसायिक कुक्कुटपालनासंबंधी शास्त्रोक्त पध्दतीची माहिती आवश्यक तेवढया प्रमाणात शेतक-यांपर्यंत पोहचत नाही. करिता, नागपूर व अकोला जिल्ह्यातील शेतक-यांसाठी व्यावसायिक कुक्कुटपालनासंबंधी तांत्रिक माहिती देणारे प्रशिक्षण व प्रात्यक्षिक केंद्राची स्थापना करणे या प्रकल्पास दि. ०५.०७.२०१४ रोजी पार पडलेल्या १८ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या बैठकीमध्ये मंजुरी प्रदान करण्यात आलेली आहे. सदर प्रकल्प नागपूर व अकोला जिल्ह्यात राबविण्यासाठी खालीलप्रमाणे शासन निर्णय निगर्मित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय—**

राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत दिनांक ५/०७/२०१४ रोजी पार पडलेल्या १८ व्या राज्यस्तरीय मंजुरी समितीच्या बैठकीमध्ये "राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर अधिनस्त पशुवैद्यक महाविद्यालय, नागपूर व स्नातकोत्तर पशुवैद्यक व पशुविज्ञान संस्था, अकोला येथे शेतक-यांसाठी व्यावसायिक कुक्कुट पालन प्रशिक्षण केंद्राची स्थापना करणे" या प्रकल्पास याद्वारे प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात येत आहे. तसेच, सदर प्रकल्पांतर्गत रू. २५५.०० लक्ष एवढ्या खर्चास वित्तीय मंजुरी देखील प्रदान करण्यात येत आहे. सदरचा प्रकल्प सन २०१४-१५ ते २०१६-१७ या कालावधीमध्ये राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने मंजुरी प्रदान केल्यानूसार व उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधीन राहून राबविण्यात यावा. प्रकल्पाचे आर्थिक निकष :- या प्रकल्पांतर्गत मंजूर केलेल्या निधीचा विहित शासकीय कार्यप्रणालीचा अवलंब करून खालील बाबीवर खर्च करण्यात यावा. **(रू. लाखात)**

| **अ. क्र.** | **बाब** | **पशुवैद्यक महाविद्यालय, नागपूर** | **स्नातकोत्तर पशुवैद्यक व पशुविज्ञान संस्था, अकोला** | **एकुण** |
|---|---|---|---|---|
| १. | प्रक्षेत्रावरील कॉकरेल, बॉयलर, लेअर शेडचे बांधकाम (१००० चौ फु.), प्रशिक्षण केंद्राचे नुतनीकरण, अंडी उबवणी कक्ष, खाद्य गोडाऊन, अस्तिवात असलेल्या शेंडचे नुतनीकरण, कुक्कुट पक्षी कत्तल प्रक्रिया कक्ष, कुंपण भिंत, सुशोभीकरण, वर्ग खोली इ. | १११.८० | ५४.९० | १६६.७० |
| २. | उपकरणे (स्वंचलित अन्न व पाणी यंत्रणा, ड्रेसींग कम प्रोसेसीग युनिट), फर्निचर, प्रशिक्षण साहित्य(एलसीडी, अडीवो सिस्टीम, संगणक इ.) | १४.०० | १९.०० | ३३.०० |
| अ. | **एकुण (१ ते २)** | १२५.८० | ७३.९० | १९९.७० |
| ब. | प्रक्षेत्रावर येणारा खर्च-कुक्कुट पक्षी खरेदी, पोल्ट्री खाद्य, औषधी इ. | १५.०० | १५.०० | ३०.०० |
| क. | **विस्तार व प्रशिक्षण** | | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | १००० प्रशिक्षणार्थांना ५ दिवसाकरिता निवास व भोजनासाठी लागणारा खर्च (भोजन रु.२५० प्रती दिन व रु.५०/- निवासाकरिता प्रति दिन = रु.३००/-प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिन ) या प्रमाणे रु.१५००/- प्रति प्रशिक्षणार्थी. | ७.५० | ७.५० | १५.०० |
| २ | प्रशिक्षण साहित्य (एका प्रशिक्षणार्थी साठी लागणारा प्रशिक्षण संच-रु.२५०/-) | १.२५ | १.२५ | २.५० |
| ३ | किरकोळ खर्च (स्टेशनरी व शैक्षणिक भेट) | २.५० | २.५० | ५.०० |
| | एकुण-क | ११.२५ | ११.२५ | २२.५० |
| | एकुण (अ + ब + क) | १५२.०५ | १००.१५ | २५२.२० |
| | प्रशासकीय खर्च १% | १.५२०५० | १.००१५० | २.५२२०० |
| | एकूण + प्रशासकीय खर्च | १५३.५७० | १०१.१५१५ | २५४.७२२ |
| | **एकुण** | | | **२५५.००** |

**राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने उपरोक्त बाबनिहाय खर्चास मान्यता प्रदान केलेली असल्याने, बाबनिहाय खर्चात कोणताही बदल करण्यात येवू नये. तसेच, कोणत्याही परिस्थितीमध्ये राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने मंजुर केलेल्या निधीपेक्षा जास्त निधी या प्रकल्पासाठी उपलब्ध होणार नाही.**

**शेतकरी प्रशिक्षणार्थींची निवड :-**

सदरच्या प्रकल्पास मोठ्या प्रमाणात जाहीर प्रसिध्दी देण्यात यावी. या प्रकल्पांतर्गत नागपूर व अकोला जिल्ह्यातील शेतकरी प्रशिक्षणार्थींची निवड संबंधित जिल्ह्यांचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांच्यामार्फत आयुक्त पशुसंवर्धन यांनी करून, निवडलेल्या प्रशिक्षणार्थींची नावे संबंधितांना कळविण्यात यावीत. शेतकरी प्रशिक्षणार्थीचे वय १८ ते ५० या दरम्यान असावे. प्रशिक्षणार्थींकडे स्वत:चा कुक्कुटपालन व्यवसाय सुरू करण्यासाठी आवश्यक जमीन / जागा असणे गरजेचे आहे. प्रशिक्षणार्थी किमान इयत्ता ७ वी उत्तीर्ण असावा. शेतकरी प्रशिक्षणार्थींची सर्व संवर्गातील अत्यल्प व अल्प भुधारक शेतकरी यांच्यामधून निवड करण्यात यावी व त्यामध्ये ३० टक्के महिला व ३ टक्के अपंग प्रशिक्षणार्थींचा समावेश असावा.

सदरचा प्रकल्प महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांच्या अधिनस्त पशुवैद्यक महाविद्यालय, नागपूर व स्नातकोत्तर पशुवैद्यक व पशुविज्ञान संस्था, अकोला यांच्यामार्फत राबविण्यात यावा. सहयोगी अधिष्ठाता, पशुवैद्यकीय महाविद्यालय, नागपूर व सहयोगी अधिष्ठाता, स्नातकोत्तर

पशुवैद्यक व पशुविज्ञान संस्था, अकोला हे सदर प्रकल्पाचे अंमलबजावणी अधिकारी राहतील. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर हे या प्रकल्पाचे सनियंत्रण अधिकारी राहतील.

सदरचा प्रकल्प महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर अधिनस्त पशुवैद्यक महाविद्यालय, नागपूर व स्नातकोत्तर पशुवैद्यक व पशुविज्ञान संस्था, अकोला येथील कुक्कुटपालनशास्त्र विभागाद्वारे राबविण्यात यावा.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर अंतर्गत नागपूर पशुवैद्यक महाविद्यालय, नागपूर स्नातकोत्तर पशुवैद्यक व पशुविज्ञान संस्था, अकोला येथे शेतक-यांसाठी व्यावसायिक कुक्कुट पालन प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्यात यावी व कुक्कुट पालनासंदर्भात शास्त्रोक्त माहिती प्रशिक्षणार्थीना प्रात्यक्षिकासह प्रशिक्षणातून देण्यात यावी. केंद्र शासनाच्या मध्यवर्ती कुक्कुट संशोधन केंद्र (CARI - Central Avian Research Institute, Izatnager) यांच्या मान्यताप्राप्त विविध कुक्कुट पक्षांच्या जातीवर प्रशिक्षणामध्ये विशेष भर देण्यात यावा.

व्यवसायिक कुक्कुटपालनाविषयी नागपूर जिल्ह्यातील ५०० व अकोला जिल्ह्यातील ५०० अशा एकूण १००० शेतकरी प्रशिक्षणार्थींना प्रात्यक्षिकासह पाच दिवसीय प्रशिक्षण वर्ग आयोजित करण्यात यावे. प्रशिक्षण कालावधी दरम्यान कुक्कुट पालन व्यवसायाच्या वेगवेगळया बाबी विषयी उदा. व्यवस्थापन, खाद्य निर्मिती, अंडी उबवणी, शेड बांधणी, कुक्कुट पक्ष्यांचे विविध आजार, प्रतिबंधात्मक लसीकरण, औषधपचार, कंत्राटी पध्दतीने कुक्कुटपालन व्यवसाय करणे, अंडी, जिवंत कोंबडी, कोंबड्यांचे मांस यांचे बाजारभाव इ. माहिती देण्यात यावी. प्रशिक्षणाच्या शेवटच्या दिवशी प्रशिक्षणार्थींची लेखी परिक्षा घेण्यात यावी.

सदरच्या प्रकल्पास संशोधन संचालक, महाराष्ट्र पशु व मस्त्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांनी तांत्रिक मंजुरी द्यावी.

हा प्रकल्प राबवून झाल्यानंतर या प्रकल्पामुळे पशुसंवर्धन विभागाच्या व एकूण राज्याच्या विकास दरात झालेली वाढ, यासह प्रकल्पाचा फलनिष्पत्ती अहवाल आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या अभिप्रायासह शासनास सादर करावा.

या प्रकल्पांतर्गत उपलब्ध झालेला निधी व त्याचा विनियोग याबाबतचा हिशोब स्वतंत्रपणे विहित लेखापध्दतीनुसार ठेवण्यात यावा. तसेच, मंजूर व उपलब्ध करून देण्यात आलेला निधी विहित कालमर्यादेत १००% खर्ची करून, त्याबाबतचे विहित प्रपत्रातील उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त पशुसंवर्धन यांनी शासनास सादर करावे.

**राष्ट्रीय कृषि विकास योजनेसंदर्भातील केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनेनूसार, सदरचा प्रकल्प कालावधी संपुष्टात आल्यानंतर, व्यावसायिक कुक्कुट पालन प्रशिक्षण केंद्रे स्वतःच्या पायावर (Self Sustainable) उभी राहतील याची व्यवस्था करावी.**

सदरचा प्रकल्प राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दि.०५.०७.२०१४ रोजीच्या बैठकीतील निर्णय व राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनूसार राबविण्यात यावा.

या प्रकल्पाचा समावेश संबंधित जिल्ह्यांच्या जिल्हा कृषि आराखड्यात (C-DAP) करण्यात येउन तसे, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांना तसेच, या कार्यासनास कळविण्यात यावे.

केंद्र शासनाने विकसीत केलेल्या RDMIS या प्रणालीवर या प्रकल्पाची माहिती भरण्यात यावी. तसेच, प्रकल्पाच्या आर्थिक खर्चाचा आणि भौतिक साध्याचा मासिक प्रगती अहवाल नियमितपणे शासनास सादर करावा.

प्रकल्प राबविताना त्याची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मुल्यमापन करणे याबाबत आवश्यक तो समन्वय अंमलबजावणी यंत्रणांनी आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी ठेवावा.

या प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीकरिता आवश्यक त्या मार्गदर्शक सूचना संचालक संशोधन, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपुर यांनी त्यांच्या स्तरावरून निर्गमित कराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९३०१२४०५८८९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MACHINDRA APPARAO PACHPINDE

Digitally signed by MACHINDRA APPARAO PACHPINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRI AND A.D.F,CID - 917089, postalCode=400032, st=Maharashtra, cn=MACHINDRA APPARAO PACHPINDE
Date: 2014.09.30 12:52:29 +05'30'

**( डॉ. एम. ए. पाचपिंडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, (कृषि व पणन), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई-३२.

२) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).

३) आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे.

४) कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर.

५) उपसचिव (राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई/नागपूर.

७) संचालक संशोधन, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपुर.

८) प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, नागपूर / अमरावती.

९) सहयोगी अधिष्ठाता, पशुवैद्यकीय महाविद्यालय, नागपूर.

१०) सहयोगी अधिष्ठाता, स्नातकोत्तर पशुवैद्यक व पशुविज्ञान संस्था, अकोला.

११) जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, नागपूर / अमरावती.

१२) जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर / अमरावती.

१३) कक्ष अधिकारी, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१४) अवर सचिव, पदुम-३/कक्ष अधिकारी पदुम-१/१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१५) निवड नस्ती पदुम-४.